**महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान**

**काटोल शहर पाणी पुरवठा योजनेतील UIDSSMT योजनेअंतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या उपांगांची प्रशासकीय मान्यता रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र.सुनिअ-२०१०/प्र. क्र.२०३/पापु२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ३० एप्रिल, २०१०**

वाचावेः- **(१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२००९/प्र. क्र.१६/पापु२२ दि.१७ फेब्रुवारी, २००९**
**(२) केंद्रीय वित्त मंत्रालयाचे आदेश क्र.एफ-५९(१०)/पीएफ-१/२००८-६८५ दिनांक ३१ मार्च, २००८**
**(३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.युआयढी२००९/प्र.क्र.१४८/नवि-३३ दि.२८ ऑगस्ट, २००९**

**प्रस्तावना**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत नागपूर जिल्हयातील **रु.८,२६,२७,२००/-** ढोबळ किंमतीच्या **काटोल** शहर पाणी पुरवठा योजनेस पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या संदर्भीय शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि, केंद्र शासन पुरस्कृत UIDSSMT योजनेअंतर्गत रु.१९१८.०० लक्ष किंमतीच्या नागपूर जिल्हयातील **काटोल** शहर पाणी पुरवठा योजनेस केंद्र शासनाने दिनांक ३१ मार्च, २००८ रोजी मंजूरी देण्यात आलेली असून दिनांक २८ ऑगस्ट, २००९ केंद्र शासनाचे रु.७६७.२ लक्ष अनुदान मुक्त करण्यात आलेले आहे. सदर अनुदानाच्या रक्कमेतून UIDSSMT योजनेअंतर्गत काटोल शहराच्या पाणी पुरवठा योजनेची कामे सुरू करण्यात आलेली असून ती प्रगतीपथावर आहेत. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या अंमलबजावणीसाठी शासन निर्णय क्रमांक नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ अन्वये विहीत करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार लहान व मध्यम शहरांच्या पायाभूत सूविधा योजनेअतंर्गत **(UIDSSMT) केंद्र शासनाद्वारे पाणी पुरवठा व मलनिःस्सारण योजनांकरिता मंजूरी देण्यात आलेल्या शहरांना त्या योजनेअंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या उपांगांची कामे पुन्हा या राज्य योजनेअंतर्गत वाढीव अनुदानासाठी प्रस्तावित करता येत नाही. तथापि, अशा मंजूरी देण्यात आलेल्या उपांगांव्यतिरिक्त त्याच शहरातील पाणी पुरवठा व मलनिःसारण योजनेतील अन्य उपांगांना महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत मंजुरी देण्यात येते.** त्या अनुषंगाने, **काटोल शहर पाणी पुरवठा योजनेतील** सदर दोन्ही योजनांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या समान उपांगांची मान्यता महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या अंमलबजावणीसाठी शासन निर्णय क्रमांक नापापु-२००८/ प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ अन्वये विहीत करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने, काटोल शहराची UIDSSMT व महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत मंजूर केलेली उपांगे समान असल्यामुळे आणि काटोल शहराची UIDSSMT अंतर्गत पाणी पुरवठा योजनेची कामे प्रगतीपथावर असल्यामुळे महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२००९/प्र. क्र.१६/ पापु२२ दि. १७ फेब्रुवारी, २००९ अन्वये **रु.८,२६,२७,२००/- किंमतीच्या नागपूर जिल्हयातील काटोल शहर पाणी पुरवठा योजनेस देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे.** तथापि, या शासन निर्णयातील काटोल शहर पाणी पुरवठा योजनेतील सुधारणा कामांचे मुल्यांकन सुधारित करून रु.१२४.३८ लक्ष किंमतीच्या सुधारणा कामांना शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२००९/प्र. क्र.१७४/पापु२२ दिनांक १०/७/२००९ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली मान्यता कायम ठेवण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०१००४३०१४४६०४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,



**(ल.गो. ढोके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.**
**२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.**
**३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.**
**४. सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.**
**५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई**
**६. महालेखापाल-१ मुंबई**
**७. महालेखापाल-२ नागपूर.**
**८. संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.**
**९. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.**
**१०. विभागीय आयुक्त, महसूली विभाग, नागपूर**
**११. जिल्हाधिकारी, नागपूर**
**१२. उप संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नागपूर**
**१३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागपूर**
**१४. संचालक, लेखाकोषागार, मुंबई.**
**१५. अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण म.नि.सं.सं.कक्ष, ठाणे.**
**१६. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर**
**१७. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, नागपूर**
**१८. अध्यक्ष/मुख्यधिकारी, नगरपरिषद काटोल**
**१९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर**
**२०. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर**
**२१. जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपालिका प्रशासन , जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर**
**२२. वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.**
**२३. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, पा.पु.व स्व.विभाग, मंत्रालय,मुंबई.**
**२४. निवडनस्ती पापु-२२**